अतिरिक्त सरकारी अभियोक्ता गट-अ यांच्या
वार्षिक सर्वसाधारण बदल्या-२०१८

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
**शासन आदेश क्रमांक : डीपीपी-०४१८/प्र.क्र.१२५/पोल-१०**
२ रा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मुंबई-४०० ०३२
दिनांक : ८ जून, २०१८

वाचा : संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्रमांक : सअब/१०४/७७/२०१८, दिनांक २४.०४.२०१८ चे पत्र.

**शासन आदेश :-**

संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये सादर केलेल्या अतिरिक्त सरकारी अभियोक्ता गट-अ यांच्या वार्षिक सर्वसाधारण बदल्यांच्या प्रस्तावाची शासन स्तरावर तपासणी करुन खाली नमूद केल्याप्रमाणे सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अतिरिक्त सरकारी अभियोक्ता | सध्याचे नियुक्तीचे ठिकाण | बदलीनंतरचा जिल्हा |
|---|---|---|---|
| १ | श्री. माधव गंगाराम पौळ | नागपुर | पुणे |

२. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्व मान्यतेने या बदल्या करण्यात येत आहेत.

३. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या अभियोक्त्यांनी बदली नंतरच्या पदस्थापनेचा कार्यभार तात्काळ स्वीकारावा. बदली आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता संचालक, अभियोग संचालनालय यांनी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

अ) सहाय्यक सरकारी अभियोक्ता संवर्गातील बदलीसाठी जिल्हा प्रस्तावित करण्यात आला असून जिल्हयात कोठेही पदस्थापना संचालक, अभियोग संचालनालय यांनी करावी

ब) बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर बदली झालेले अभियोक्ता त्यांच्या सध्याच्या पदावरुन कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. सदर अभियोक्त्याला रुजू करुन न घेतल्यामुळे काम न देता सक्तीचा प्रतिक्षाकाळ ठरवून वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधीत अधिकाऱ्यांना जबाबदार धरण्यात येईल.

क) संबंधित अभियोक्त्यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास त्वरीत कळवावे.

४. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अभियोक्त्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधित अभियोक्त्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६०८१९३८४७०२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ce6f6edd7e1dfc6b4d6b65b7d93aa1a1dbcf0ec79c7c2143850ff6e8fdcb4c0d, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2018.06.08 19:40:50 +05'30'

**(किशोर शामराव भालेराव)**
**उप सचिव (विधि), गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.राज्यमंत्री (गृह/शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री (गृह/ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव (अ.व सु.) यांचे स्वीय सहाय्यक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
६) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८) अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी
१०) संबंधीत अतिरिक्त सरकारी अभियोक्ता (संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या मार्फत)
११) निवड नस्ती (पोल-१०)